महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठांतर्गत चालविण्यात येणाऱ्या अभ्यासक्रमांना व्यावसायिक अभ्यासक्रम म्हणून घोषित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक मपवि २०१७/प्र.क्र. ५७/म्हापसू**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ९ ऑगस्ट २०१७

**<u>वाचा</u> :** १) भारतीय कृषि अनुसंधान परिषदेचे पत्र क्र Edn/१३/१/२०१६-HRD, दि. ६.१०.२०१६.
२) शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्र. संकिर्ण १५१७/ प्र.क्र.२०/७ अे, दिनांक १५ जुलै, २०१७

**<u>प्रस्तावना</u> -**

कृषि व तत्सम शिक्षणाबाबत भारतीय कृषी अनुसंधान परिषद, नवी दिल्ली यांनी सूचीत केलेली मार्गदर्शक तत्वे/ अटी व शर्ती या संपूर्ण देशातील कृषी व पशुविज्ञान शिक्षण संस्थांसाठी लागू ठरतात. भारतीय कृषि अनुसंधान परिषदेच्या नियामक मंडळाच्या दिनांक २९ जून, २०१७ च्या बैठकीत कृषि व तत्सम शिक्षण क्षेत्रातील खालील एकूण १२ पदवी अभ्यासक्रमांना व्यावसायिक अभ्यासक्रम म्हणून घोषित करण्यात आले आहे:-

२. कृषि (Agriculture), फलोत्दन (Horticulture), कृषि अभियांत्रिकी (Agricultural Engineering), वनशास्त्र (Forestry), अन्न व तंत्रज्ञान (Food Technology), जैवतंत्रज्ञान (Biotechnology), पशुवैद्यक आणि प्राणि शास्त्र (Veterinary & Animal Science), दुग्ध तंत्रज्ञान (Dairy Technology), रेशीम किडे शास्त्र (Sericulture), मत्स्य विज्ञान (Fisheries), गृह विज्ञान/ सामाजिक विज्ञान ( Home/Community Science) आणि अन्न व पोषण आहार शास्त्र (Food Nutrition & Dietetics) या पदवी अभ्यासक्रमांना व्यावसायिक अभ्यासक्रम म्हणून घोषित करण्यात आले आहे.

३. उक्त १२ अभ्यासक्रमांपैकी पशुवैद्यक आणि प्राणि शास्त्र (Veterinary & Animal Science), दुग्ध तंत्रज्ञान (Dairy Technology) व मत्स्य विज्ञान (Fisheries) वगळता उर्वरीत ९ अभ्यासक्रमांना कृषि उपविभागाने संदर्भाधीन अ. क्र. २ येथील दि १५ जुलै २०१७ च्या शासन निर्णयान्वये व्यवसायिक अभ्यासक्रम म्हणून घोषित केले आहे. त्यानुसार पशुवैद्यक आणि प्राणि शास्त्र (Veterinary & Animal Science), दुग्ध तंत्रज्ञान (Dairy Technology), मत्स्य विज्ञान (Fisheries) या अभ्यासक्रमांना व्यावसायिक अभ्यासक्रम म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** –

४. कृषि व तत्सम शिक्षणाबाबत भारतीय कृषि अनुसंधान परषिद, नवी दिल्ली यांनी निर्देशीत केल्यानुसार महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठांतर्गत चालविण्यात येणाऱ्या खालील अभ्यासक्रमांना "**व्यावसायिक अभ्यासक्रम**" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

१. पशुवैद्यक आणि प्राणि शास्त्र (Veterinary & Animal Science),

२. दुग्ध तंत्रज्ञान (Dairy Technology),

३. मत्स्य विज्ञान (Fisheries)

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या सांकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८१०१५४७५५०८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vikas Tulshiram Kadam

Digitally signed by Vikas Tulshiram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, cn=Vikas Tulshiram Kadam
Date: 2017.08.10 16:33:23 +05'30'

**(विकास तु. कदम)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई -३२.
४. प्रधान सचिव (कृषि), मंत्रालय, मुंबई -३२.
५. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधान भवन, मुंबई
६. मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद, विधान भवन, मुंबई
७. कुलगुरु, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, फुटाळा तलाव रोड, नागपूर
८. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, फुटाळा तलाव रोड, नागपूर
१०. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.
११. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.
१२. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
१३. निवड नस्ती